अस्तित्त्वातील ट्रॉल जाळी व डोल जाळीमध्ये उपलब्ध असलेल्या कॉड एन्ड जाळीच्या आसमध्ये ४० मि.मी. असा बदल करणेबाबत

सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अर्थसहाय्य.....

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१७/ प्र.क्र.१३६/ पदुम १४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : २१ जून, २०१७

वाचा

१) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मत्स्य/ भू/०२०९०१/०८/२०१७, दि. २०.०१.२०१७

२) कृषि व पदुम विभाग शासन अधिसुचना क्रमांक मत्स्यवि-२०१२/ प्र.क्र १६६/ पदुम १४, दि. १०.०१.२०१७

३) कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्र. RKVY-१२१६/ C.R. १४६/RKVY CELL, दि. ०८.०५.२०१७

४) कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग पत्र क्र. आरकेव्ही-०३१७ प्रक्र.१४/ आरकेव्हीवाय सेल, दि. ९.६.२०१७ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

प्रस्तावना:

मासेमारी व्यवसायातील विविध घटकांचे विशेषत: पारंपरिक मच्छीमारांचे हितसंबंध जपणे व मासेमारी प्रयत्नांचे व्यवस्थापनाद्वारे मत्स्यसाठ्यांचे जतन करणे, पर्ससीन मासेमारी व तिचा राज्याच्या किनाऱ्यांवरील पारंपरिक मासेमारीवर व पर्यावरणावर होणारा प्रतिकूल परिणाम यांचा अभ्यास करण्यासाठी, तसेच शाश्वत मत्स्योत्पादनासाठी उपाययोजना सुचविण्यासाठी शासनाने डॉ. व्ही. एस. सोमवंशी यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास समिती गठित केली होती.

वरील समितीने केलेल्या २५ शिफारसीपैकी ट्रॉलर्सद्वारे करण्यात येणाऱ्या मासेमारीवर निर्बंध घालणे आवश्यक आहे अशी एक शिफारस अंतर्भुत आहे. सदर शिफारसीच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. २ येथील शासन अधिसुचनेद्वारे राज्याच्या सागरी जलधीक्षेत्रात कोणत्याही ट्रॉलच्या सहाय्याने मासेमारी करताना, ट्रॉल जाळ्याच्या खोलाचा भाग (कॉड एन्ड) चौरस आकाराच्या आसाचा (स्क्वेअर मेश) व आसाचा आकार (बार मेश) ४० मि. मी. पेक्षा कमी असु नये, अशी अधिसुचना निर्गमीत करण्यात आली आहे.

सद्यस्थितीत मच्छिमारांकडे उपलब्ध ट्रॉल जाळ्याचा कॉड एन्ड चा आस हा २५-३५ मि. मी. असुन सदरचा कॉड एन्डचा आस हा ४० मि. मी. आसाचा चौरस आकाराचा असा बदलल्यास लहान मासे व मत्स्यबीज जाळ्यात न अडकता शाश्वत राहतील जेणेकरून त्यांची वाढ नैसर्गिकरित्या होऊन प्रजननक्षम होतील. परिणामी मासळी साठ्याचे जतन करणे शक्य होईल. सदर वस्तुस्थिती लक्षात

घेऊन अस्तित्वातील जाळ्याचे कॉड एन्डमध्ये बदल करण्यासाठी आर्थिक साह्य उपलब्ध व्हावे त्यासाठी संदर्भाधीन १ येथील पत्रान्वये आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी ट्रॉल व डोल जाळ्याचा कॉड एन्डमध्ये बदल करून सदरचा आस ४० मि. मी. करण्यासाठी प्रकल्प किंमत रु.१,७३,७०,०००/- तसेच, रु.२३,३०,०००/- चा प्रशिक्षण कार्यक्रम असा एकूण रू. १,९७,००,०००/- इतक्या किंमतीचा सविस्तर प्रकल्प अहवाल राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत शासनास सादर केला होता. सदर अर्थसहाय्याचे स्वरूप राष्ट्रीय कृषि विकास योजना हिस्सा ९० टक्के व लाभार्थी हिस्सा १० टक्के या प्रमाणात प्रस्तावित करण्यात आले आहे. सदर प्रकल्प अहवाल दि. १३.०१.२०१७, दि. ०४.०२.२०१७ व दि. ०३.०३.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीसमोर सादर करण्यात आला असता संदर्भाधीन क्र ३ येथील पत्रान्वये निर्गमीत करण्यात आलेल्या इतिवृत्तांन्वये त्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर प्रस्ताव दि. २५.०५.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीसमोर ठेवण्यात आला असता त्यास संदर्भाधीन क्र. ४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सादर केलेला प्रस्ताव व राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने दिलेली मान्यता लक्षात घेता उपरोक्त प्रमाणे पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या ७ सागरी जिल्ह्यांमध्ये वापरात असलेल्या ट्रॉल जाळी व डोल जाळीच्या कॉड एन्डमध्ये ४० मि. मी. चौरस आकाराचा आस बदलणे व त्यासाठी प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करण्याच्या सविस्तर प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

राज्यातील ७ सागरी जिल्हयांमध्ये पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड,रत्नागिरी व सिंधुदुर्ग जिल्हयामध्ये नोंदणीकृत ट्रॉल पध्दतीने मासेमारी करणा-या नौकांच्या ट्रॉल जाळी व डोल जाळीच्या कॉड एन्डमध्ये ४० मि. मी. चौरस आकाराचा आस बदल करणे तसेच त्याबाबतचे प्रशिक्षण मच्छिमारांना देण्यासाठी रू. १.९७ कोटी इतक्या रकमेच्या प्रकल्प अहवालास खालीलप्रमाणे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या योजनेनुसार होणा-या एकूण खर्चातील हिस्सा राकृवियो हिस्सा व लाभार्थी हिस्सा ९०:१० या प्रमाणात राहील. त्याबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**(रू. कोटी)**

| **अ.क्र.** | **बाब** | **प्रकल्प किंमत** | **राकृवियो हिस्सा (९०%)** | **लाभार्थी हिस्सा (१०%)** |
|---|---|---|---|---|
| १ | ट्रॉल जाळी व डोल जाळीच्या कॉड एन्डमध्ये ४० मि. मी. चौरस आकाराचा आस बदल करणे | १.७३७ | १.५६३३ | ०.१७३७ |
| २ | प्रशिक्षण | ०.२३३ | ०.२०९७ | ०.०२३३ |
| | **एकूण** | १.९७ | १.७७३ | ०.१९७ |

निवडीचे निकष

सदर प्रकल्प अंमलबजावणीच्या अटी/ शर्ती खालीलप्रमाणे राहतील-

१) महाराष्ट्र राज्यात नोंदणी झालेल्या महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम, १९८१ अंतर्गत ट्रॉलिंग पद्धतीने मासेमारी परवानाधारक नौका, सदर प्रकल्पाचा लाभ घेण्यास पात्र राहतील. सदर नौका मालकांकडे बायोमेट्रिक कार्ड, नौकेचा विधीग्राह्य परवाना व कलरकोड असणे आवश्यक आहे.

२) सदर प्रकल्पातील अनुदानाचा लाभ एकदाच पात्र लाभार्थ्यास डीबीटीमार्फत लाभार्थ्याच्या थेट खात्यावर जमा करण्यात येईल.

३) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे उपरोक्त प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी राहतील.

४) प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी ही आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची राहतील. प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी ही आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२११७३४०१८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.06.21 17:32:09 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
८) सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, पालघर/ठाणे/मुंबई उपनगर/मुंबई शहर/ रायगड /रत्नागिरी/सिंधुदुर्ग
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) सर्व उप कोषागार अधिकारी
१३) सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१४) अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राकृवियो कक्ष,पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
१५) निवडनस्ती